ठाणे जिल्हा सामान्य जिल्हा रुग्णालयाची इमारत मोडकळीस आल्याने सदर रुग्णालयाचे स्थलांतर करण्यासंदर्भात निर्णय घेण्यासाठी मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः ठाजिरु-२०१८/प्र.क्र.२७२/आरोग्य-३ अ

गो.ते.रुग्णालय संकुल, दहावा मजला, संकुल इमारत
मंत्रालय, मुंबई ४००००१
दिनांक: २५ सप्टेबर,२०१८

वाचा

१) **मा.मुख्य सचिव, यांच्या कार्यालयाची दिनांक १२ जुलै,२०१८ ची टिप्पणी**

### प्रस्तावना

ठाणे जिल्हा सामान्य रुग्णालयाची इमारत मोडकळीस आल्यामुळे सदर रुग्णालय राज्य कामगार विमा रुग्णालयाच्या जागेत हलविण्यासंदर्भात निर्णय घेण्यासाठी मा.मंत्री (सार्वजनिक आरोग्य)/मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याबाबत मा.राज्यमंत्री मंडळाच्या बुधवार दिनांक २०/६/२०१८ रोजीच्या बैठकीत निदेश देण्यात आलेले आहे. त्यानुसार याबाबत अंतिम निर्णय शासन मान्यतेने घेण्याकरीता समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

### शासन निर्णय

ठाणे जिल्हा सामान्य रुग्णालयाची इमारत मोडकळीस आल्यामुळे सदर रुग्णालय राज्य कामगार विमा रुग्णालयाच्या जागेत हलविण्यासंदर्भात किंवा अन्य सुयोग्य ठिकाणी स्थलांतरीत करण्यासंदर्भात निर्णय घेण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पद | समितीवरीलनियुक्ती |
|---|---|---|
| १ | मा.मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २ | प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य) | सदस्य |
| ३ | आयुक्त, ठाणे महानगरपालिका | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ४ | आयुक्त, तथा अभियान संचालक आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई | सदस्य |
| ५ | संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई | सदस्य |
| ६ | जिल्हाधिकारी, ठाणे | सदस्य |
| ७ | संबंधित सह सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, | समन्वयक |

**समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील-:**

* ठाणे येथील जिल्हा सामान्य रुग्णालयाचे स्थलांतर तातडीने करण्यासाठी ठाणे शहरातील इमारत उपलब्ध करण्यासाठी पाहणी करुन पर्यायी व्यवस्था करणे आणि सध्या ज्या ठिकाणी रुग्णालय सुरु आहे त्यांची सूरक्षिततेचा अभ्यास करुन रुग्णालयाचे कामकाज सुरळीतपणे चालविण्यासाठी उपाययोजना सुचविणे.

* उपरोक्त प्रस्तावाबाबत विचार विनिमय करण्यासाठी सर्व संबंधित शासकीय अधिकारी यांना बैठकीसाठी निमंत्रीत करण्याची समितीचे अध्यक्ष यांना मुभा राहील.

उपरोक्त समिती आपला अहवाल याबाबतच्या आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्यात शासनास सादर करील. समितीचा अहवाल प्राप्त झाल्यानंतर सदर रुग्णालयाचे स्थलांतरण करण्याबाबतचा अंतिम निर्णय शासन मान्यतेने घेण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९१९१५४३२५१४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shamraoji Kaurte

Digitally signed by Rajendra Shamraoji Kaurte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ed4c738df60ac2ac776b9e2481f77ad50ab a9dc28bb31a482e03c7ee7b6f64d8, serialNumber=7caa550613a8c4cb7c593368faa24e 20d6f8985f510118e6fc1af8b04a443ee8, cn=Rajendra Shamraoji Kaurte
Date: 2018.09.25 16:20:46 +05'30'

**रा.शा.कौरते**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री सार्वजनिक आरोग्य व कुंटुब कल्याण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय मुंबई-३२.

२. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.
३. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४. आयुक्त, ठाणे महानगरपालिका, ठाणे
५. आयुक्त तथा अभियान संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य भवन, मुंबई
६. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, आरोग्य भवन, मुंबई
७. जिल्हाधिकारी, ठाणे
८. उप संचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे
९. सह सचिव, (रुग्णसेवा) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. जिल्हा शल्यचिकित्सक, सामान्य रुग्णालय ठाणे
११.निवडनस्ती कार्यासन (आरोग्य-३ अ )